आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत वनजमिनीची मोजणी करण्याकरीता शुल्काचे प्रदान या योजनेंतर्गत नियुक्त कंत्राटी मनुष्यबळ व कार्यालयीन खर्चासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशिर्ष २२२५ डी २५१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०२/कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०३ जुलै,२०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) शासन परिपत्रक, आ.वि.वि. क्र.वहका-२०१८/प्र.क्र.४३/का-१४, दि.११.५.२०१८.
३) आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयाचे पत्र क्र.आसंप्रसं-२०२३-२४/ वहका-४५/का-४/३९७, दि.०२.०६.२०२३.
४) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र.वहका-२०२३/प्र.क्र.१२६/का-१४.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम, २००६ नियम, २००८ व सुधारणा नियम, २०१२ ची कोटेकोर अंमलबजावणी करुन वनहक्क दावे व अपील यांचा कालबध्द निपटारा करण्यासाठी “वनमित्र योजना” राबविण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. या अंतर्गत जिल्हास्तरीय वनहक्क समितीने मान्य केलेल्या वैयक्तिक वनहक्क दाव्यांमधील वनक्षेत्र भूमी अभिलेख विभागाकडून मोजण्याची कार्यवाही करण्यात येत असल्याने याकरीता आवश्यक निधी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत “नोडल एजन्सी” म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन देण्यात येतो. या अनुषंगाने राज्यातील वनहक्क कायदा अंमलबजावणीसाठी नियुक्त कंत्राटी मनुष्यबळ व कार्यालयीन खर्चासाठी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी केलेल्या मागणीस अनुसरुन आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून रु.५५८.२८ लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास संदर्भाधीन क्र.४ अन्वये सादर करण्यात आला होता.

सदर प्रस्तावावर वित्त विभागाने या योजनेसाठी अर्थसंकल्पित तरतुदीच्या २० टक्के मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. वित्त विभागाच्या उपरोक्त मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक या मुख्य लेखाशिर्षाखाली अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरीता शुल्काचे प्रदान करणे या योजनेंतर्गत राज्यातील वनहक्क कायदा अंमलबजावणीसाठी नियुक्त कंत्राटी मनुष्यबळ व कार्यालयीन खर्चासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून २० टक्के मर्यादेत रु.३००.०० लाख इतका निधी पुढीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पित निधी** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरीता शुल्काचे प्रदान | २२२५ डी२५१ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १५००.०० | ३००.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.३००.०० लाख (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१५.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय कार्यालय प्रमुखाची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६०२/२०२३-व्यय-१४, दि.२२.०६.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०३१८२६२९३८२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.07.04 13:32:42 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. जिल्हाधिकारी, ठाणे/ रायगड/ पालघर/ पुणे/ सातारा/ सांगली/ कोल्हापूर/ नाशिक/ अहमदनगर/ जळगाव/ धुळे/ नंदूरबार/ औरंगाबाद/ नांदेड/ अमरावती/ यवतमाळ/ भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर/ गडचिरोली/ वाशिम/ हिंगोली/ नागपूर/ बुलढाणा/ अकोला/ वर्धा/.
७. प्रकल्प अधिकारी, औरंगाबाद/ यवतमाळ/ पांढरकवडा/ पुसद/ अहेरी/ भामरागड/ गडचिरोली/ घोडेगाव/ कळवण/नाशिक/किनवट/तळोदा/नंदुरबार/देवरी/चिमूर/चंद्रपूर/डहाणू/जव्हार.
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१४, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (कार्या-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.